**संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय यांच्या अधिपत्याखालील गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन आदेश क्रमांक:- बदली-२०२५/प्र.क्र.७१/उद्योग-४**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३० मे, २०२५.

**संदर्भ** :- महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

**<u>शासन आदेश</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक व्यवस्थापक, कामगार कल्याण अधिकारी व सहायक संचालक या गट-ब (राजपत्रित) संवर्गातील खालील तक्त्यात नमुद केलेल्या अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सद्याचे कार्यरत ठिकाण | बदलीने दिलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **सहायक व्यवस्थापक, गट-ब (राजपत्रित)** | | | |
| १ | श्री.के.कृ.लाड | शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर | शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई |
| २ | श्री.स.ह.केदार | शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे | शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर |
| ३ | श्री.अ.शि.गंगावणे | शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर | शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई |
| ४ | श्री.सं.मा.ढवळे | शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे | शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई |
| **सहायक संचालक, गट-ब (राजपत्रित)** | | | |
| १ | श्री.सु.ब.मदगे | शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई | शासकीय लेखनसामग्री भांडार, पुणे |
| २ | श्री.पु.सु.वाघमारे | शासकीय लेखनसामग्री भांडार, नागपूर | शासकीय लेखनसामग्री व ग्रंथागार, छत्रपती संभाजीनगर |

२.        सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये शासन स्तरावरुन एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल संबंधितांनी संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांना सादर करावा.

३.      सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही. संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत शासनास त्वरित कळवावे.

४.      संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/का.१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५.      महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्या **अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन** (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६.      संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू न झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत, असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७.      सदरहू आदेशानुसार बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी व गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

८.      सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०५३०१७४७२८९११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAXMIKANT
GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2025.05.30 17:48:21 +05'30'

**( लक्ष्मीकांत ढोके )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

1) मा. मंत्री (उद्योग) / मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२) संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई / नागपूर

४) प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे / नागपूर / कोल्हापूर

७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

८) सर्व संबंधित अधिकारी, द्वारा संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई

९) निवड नस्ती.